"आरोग्य सेवा संचालनालय" या कार्यालयाचे नामाभिधान "आरोग्य सेवा आयुक्तालय" असे करण्याबाबत .

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१९/प्र.क्र.२६२/आरोग्य-३अ

गो.ते.रुग्णालय संकुल, दहावा मजला, संकुल इमारत

मंत्रालय, मुंबई ४००००१

दिनांक: १६ जानेवारी, २०२०

**वाचा :-**

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. पदस्था १३१५/प्र.क्र ५०/ सेवा-२ दि.३१ मार्च, २०१५

२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. पदस्था १३१५/प्र.क्र ५०/ सेवा-२ दि.१८ ऑक्टोबर, २०१६

३) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र. १११/आरोग्य ३ दि.६ मार्च, २०१९

४) सहसंचालक, ( अर्थ व प्रशासन) ,आरोग्य सेवा,मुंबई यांचे पत्र क्र. संआसे/कक्ष५/टे-२/आयुक्तालय/२६१८/१९ , दिनांक १६ जुलै, २०१९

**प्रस्तावना :-**

समाजातील सर्व घटकासाठी विविध आरोग्य सेवा व सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी तसेच आरोग्य विषयक कार्यक्रमांची अंमलबजावणी व संनियंत्रण करण्यासाठी राज्यस्तरावर संचालक, आरोग्य सेवा हे पद निर्माण करण्यात येवून आरोग्य सेवा संचालनालय स्थापन करण्यात आले होते. तथापि दिनांक १८.१०.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये आयुक्त, कुटुंब कल्याण तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई या पदाचे पदनाम आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई असे करण्यात आले होते. तसेच संचालक, आरोग्य सेवा यांच्या ऐवजी आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान , मुंबई यांना विभागप्रमुख म्हणून घोषित करण्यात आले आहे. या अनुषंगाने आरोग्य सेवा

संचालनालयाच्या नावामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन खालीलप्रमाणे निर्णय करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

"आरोग्य सेवा संचालनालय" या कार्यालयाचे नामाभिधान "आरोग्य सेवा आयुक्तालय" असे करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२२६१६४९४५५०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2020.01.16 14:30:18 +05'30'

**( रो.दि.कदम-पाटील )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. राज्यमंत्री (सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सह सचिव/उपसचिव (सर्व), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. आयुक्त, आरोग्य सेवा तथ अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई

९. संचालक, आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई

१०. संचालक, आरोग्य सेवा-२, आरोग्य सेवा संचालनालय, पुणे

११. सहसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)

१२. सहायक संचालक (अ.प्र.), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई

१३. उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळे (सर्व)

१४. जिल्हा शल्यचिकित्सक (सर्व)

१५. जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)

१६. सर्व कार्यासने, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई

१७. निवड नस्ती (आरोग्य -३अ)